**प्रशासकीय मान्यता**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मिरज येथे सुक्ष्मजीवशास्त्र विभागाअंतर्गत विषाणू निदान संशोधन प्रयोगशाळाचे (Viral Research Disgnostic Laboratory -व्ही.आर.डी.एल.) बांधकाम व विद्युतीकरण करणेसाठी.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : व्हीआरएल-२०१८/प्र.क्र.२८८/प्रशा-१
गो.ते.रुग्णालय आवार,नविन मंत्रालय, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १२ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा :** संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे क्रमांक : संवैशिवसं/ शावैमरुमि/ सुक्ष्मजीवशास्त्र व्हीआरडीएललॅब/१५८१५/प(आय)/१८,८१७३, दि. ०३.०८.२०१८.

**शासन निर्णय :**

विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मिरज येथे सुक्ष्मजीवशास्त्र विभागाअंतर्गत विषाणू निदान संशोधन प्रयोगशाळाचे (Viral Research Diagnostic Laboratory -व्ही.आर.डी.एल.) बांधकाम व विद्युतीकरण करणेसाठी खालील तक्त्यात दर्शविलेल्या प्रमाणे कामे करण्यासाठी एकूण रु.४९,४६,४७८/- (रुपये एकोणपन्नास लक्ष सेहचाळीस हजार चारशे अठ्ठयात्तर फक्त ) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | संचालनालयाने प्रस्तावित केलेली रक्कम रुपये | छाननीअंती मान्य केलेली रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | Repairs to partition, WC block, water supply line & drainage line in V.R.D.L. Lab at GMC&H Miraj | १३,५०,७३८ | १३,५०,७३८ |
| २ | Repairs of ceiling, flooring, doors & windows in V.R.D.L. Lab at GMC&H Miraj | १३,२५,४०४ | १३,२५,४०४ |

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | संचालनालयाने प्रस्तावित केलेली रक्कम रुपये | छाननीअंती मान्य केलेली रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| | | | |
| ३ | Repairs of roof in VRDL lab in Old Pharamacology Deptt. at GMC&H Miraj | १२,३७,७४५ | १२,३७,७४५ |
| ४ | व्ही.आर.डी.एल. लॅब स्थापन करणेसाठी विभागात नुतनीकरण व अंतर्गत विद्युतीकरण करणे. | १०,३२,५९१ | १०,३२,५९१ |
| | एकूण | ४९,४६,४७८ | ४९,४६,४७८ |

**अटी व शर्ती :-**

१. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

२. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

३. कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अभियंता/अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

४. कामासाठी जागेची उपलब्धता, जागा पुरेशी आहे किंवा नाही, याबाबतची खात्री संबंधीत संस्था प्रमुखांनी करावी.

५. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.: इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. संबंधीत संस्थेच्या अधिष्ठातांनी या विभागाचे शासन परिपत्रक दिनांक ७.२.२०१३ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांचे पालन करावे.

२. सदरहू स्थापत्य व विद्युतीकरणाची कामे, भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली मार्फत १२ व्या पंचवार्षिक योजनेमध्ये Establishment of Network of laboratories for managing Epidemic and Natural calamities for implementation या योजनेअंतर्गत सामंजस्य कराराच्या अनुषंगाने भारतीय आयुर्विज्ञान संशोधन परिषद, नवी दिल्ली यांच्याकडून संस्थेस प्राप्त झालेल्या निधीमधून करण्यात यावे.

३. हा शासन निर्णय ,वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका-१९७८ भाग-१, उप विभाग-५ अनुक्रमांक-१ व ५ , महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३) यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२७७/इमा-३, दिनांक २४.०९.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच संकेतांक २०१८१११२१५५८२३४८१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2018.11.12 18:14:12 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,मुंबई.
२) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
३) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मिरज.
४) सार्वजनिक बांधकाम विभाग, (इमारत-३), मंत्रालय, मुंबई.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मिरज, जि.सांगली.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
७) निवडनस्ती (प्रशा-१).